महाराष्ट्र विकास सेवा गट -अ मधील अधिकाऱ्यांच्या बदल्या / नियुक्त्या.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग

शासन आदेश क्रमांक : मविसे-१०२०/प्र.क्र.७४/२०२०/आस्था-३,
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१.
दिनांक: ०२ सप्टेंबर, २०२०.

**शासन आदेश :-**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम , २००५ मधील तरतूदींनुसार बदली करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने बदली प्रस्तावित असलेल्या अधिकाऱ्यांच्या बाबतीत उक्त अधिनियमाच्या कलम ४(१), ४(२) आणि ४(३) मधील तरतूदींनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या पूर्वमान्यतेने या विभागातील खालील अधिकाऱ्यांच्या बदल्यांचे आदेश शासन देत आहे . बदलीनंतर संबंधित अधिकाऱ्यांची नियुक्ती त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र .३ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्या धारण केलेले पद व ठिकाण | बदलीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| १. | श्री.ए.एस.शेंगुलवार, अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, उस्मानाबाद | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद , हिंगोली | रिक्त पदी |
| २. | श्री.ए.जी.नवाळे, प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामिण विकास यंत्रणा, जिल्हा सोलापूर | अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद , उस्मानाबाद | श्री.ए.एस.शेंगुलवार, यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी |
| ३. | श्रीमती पी.पी.जाखलेकर उप मुख्य कार्यकारी अधिकारी (साप्र), जिल्हा परिषद, नागपूर | उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रापं), जिल्हा परिषद, वर्धा | रिक्त पदी |

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव, सध्या धारण केलेले पद व ठिकाण | बदलीने पदस्थापनेचे पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) |
| ४. | श्री.पी.ए.दाभाडे, गट विकास अधिकारी, पंचायत समिती, सिल्लोड्ड , जिल्हा औरंगाबाद | गट विकास अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद | रिक्त पदी |

२. (१) श्रीम.एस.ए.कडू-धोटे, सह मुख्य कार्यकारी अधिकारी (क्षमता बांधणी) वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा, पुणे (२) श्री.एम.एस.घुले, उप मुख्य कार्यकारी अधिकारी (साप्र), जिल्हा परिषद, पुणे (३) श्री.बी.ए.बोटे, उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रापं), जिल्हा परिषद , जळगांव (४) श्री.एस.एन.कोहिणकर, उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रापं), जिल्हा परिषद, पुणे या अधिकाऱ्यांना सध्याच्या कार्यरत पदावर १ वर्ष मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. श्री.व्ही.आर.कोंडेकर, उप मुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रापं), जिल्हा परिषद , नांदेड यांना सध्याच्या कार्यरत पदावर सेवानिवृत्तीच्या दिनांकापर्यत मुदतवाढ देण्यात येत आहे.

४. संबंधित अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरीत स्वीकारावा . तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक : सीडीआर १०८२/२५६७/२८/अकरा, दिनांक ३०.८.१९८२ च्या परिपत्रकाकडे वेधण्यात येत आहे . त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची त्यांनी नोंद घ्यावी.

५. संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांच्या नियुक्तीच्या जागी तात्काळ रुजू होण्यास सांगावे. जे मुख्य कार्यकारी अधिकारी बदली झालेल्या अधिकाऱ्यांना विहित मुदतीत कार्यमुक्त करणार नाहीत, अशा अधिकाऱ्यांच्या विरुध्द शिस्तभंग कार्यवाहीबाबतचा प्रस्ताव संबंधित विभागीय आयुक्तांनी शासनास सादर करावा.

६. संबंधित अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास कळवावा. जे अधिकारी कार्यमुक्तीनंतर विहित कालावधीत बदली झालेल्या पदावर रुजू होणार नाहीत, अशा अधिकाऱ्यांविरुध्द संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी विभागीय आयुक्तांमार्फत शिस्तभंग विषयक कार्यवाहीचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९०२१०२५१६९३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dr Vasant Gopal Mane

Digitally signed by Dr Vasant Gopal Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=19c1f05a32104713094b1babbae721a60140a8f1f9e16ca9d8dc3eaf7de15d65, cn=Dr Vasant Gopal Mane
Date: 2020.09.02 13:17:37 +05'30'

( डॉ.वसंत माने)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. मंत्री ( ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव,
२) मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव,
३) मा. अतिरिक्त मुख्य सचिव (ग्राम विकास व पंचायत राज) यांचे स्वीय सहायक,
४) विभागीय आयुक्त (सर्व),
५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, (सर्व),
६) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व),
७) महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
८) संबंधित अधिकारी (संबंधित विभागीय आयुक्त / मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत.),
९) कार्यासन, आस्था-२, ग्राम विकास विभाग,
१०) निवड नस्ती (कार्यासन, आस्था-३), ग्राम विकास विभाग.